सर्व वस्तुस्थिती ज्ञात झाल्यावर मच्छिंद्रनाथ आणि गोरक्षनाथांना शशांगर राजाचा पुत्र कृष्णागर विषयी करुणा उत्पन्न झाली. त्यांच्या दिव्य दृष्टीला कृष्णागर हा अवतारी पुरुष असल्याचे आकलन झाले आणि शशांगराच्या परवानगीने त्याचा पत्कर स्वीकारला, त्याच्यावर प्राथमिक उपचार करून त्याला घेऊन ते बद्रिकेदार येथे गेले. आणि त्याचे पुनर्वसन करण्यासाठी काही योजना पक्की केली आणि श्रीदत्तगुरूंच्या भेटीसाठी गिरनार पर्वतावर निघाले.

लौकिक अर्थाने कृष्णागर हा कौंडीप्यपुर नरेश शशांगर महाराजांचा पुत्र असला तरी साक्षात श्रीशिवाच्या तेजापासून त्याची निर्मिती झाली होती. शशांगराच्या शिव आराधनेची फलश्रुती म्हणूनच कृष्णागराची उत्पत्ती झाली होती. उभय नाथांनी त्याचे नामकरण चौरंगी असे केले. याच शिवपुत्र चौरंगीला हिमालयात तपाला बसवून मच्छिंद्र आणि गोरक्ष गिरनार पर्वतावर श्रीदत्त आश्रमात पोहोचले. श्रीदत्तमाऊलींच्या दर्शनाने मच्छिंद्रनाथ आनंदीत झाले. तीच अवस्था दत्तांची झाली. त्यांनी चरणांवर लोटांगणासाठी ओणवे झालेल्या मच्छिंद्राला उठवले आणि हृदयाशी कवटाळले, त्याच्या पाठीवर वात्सल्याने हात फिरवीत म्हणाले, “मत्स्येंद्रा!! हरिणीने व्याकुळ होऊन पाडसाची वाट पहावी, तद्वत तुझी आतुरतेने तुझी वाट पाहतांना माझे नेत्र सुकून गेले. चंद्र पृथ्वीच्या समीप आल्यानंतर सागराचे पाणी जसे चंद्राकडे आकर्षित होते. त्याचप्रमाणे माझे मन तुझ्याकडे धाव घेत होते. प्रदीर्घ कालावधीनंतर आज माझे पाडस मला भेटले, पुत्रा! आता माझ्यापासून दूर जाऊ नकोस.” गुरुशिष्य काही वेळ एकमेकांच्या मिठीत विसावले. माता जशी तान्हुल्याला क्षणभरासाठीही विसंबत नाही. त्या प्रमाणे दत्तमाऊलींना मच्छिंद्र बाळाचा क्षणभरासाठीही विसर पडत नव्हता. त्याला सतत आपल्या सान्निध्यात ठेवत होते. योग संयोग, सुखदुःख, तीर्थयात्रा भ्रमंती इत्यादी नाना गोष्टींची विचारपूस चर्चा घडत काळ सरत होता. पाहता पाहता सहा महिने कसे लोटले हे सुद्धा कळले नाही. एकाच स्थानी इतका काळ गेल्यावर गोरक्षनाथ मात्र बेचैन झाले कारण लोककल्याणासाठी अवतार धरण करणाऱ्यांनी एकाच स्थानी राहून चालणारे नव्हते. ते श्रीदत्तांना म्हणाले, “गुरुपिता महाराज! साधू संतांच्या दर्शनाने पुण्य संचय व्हावा म्हणून तीर्थस्थानांची निर्मिती झाली आहे. तरी आता आम्हाला तीर्थयात्रेला जाण्याची आज्ञा द्यावी. जगताचे दुःख आणि अज्ञान दूर करण्यासाठी तर आमचा अवतार आहे. त्यामुळे आमचे कर्तव्य आम्हाला केले पाहिजे. एका जागी बसून राहिलो तर जगाचे कल्याण कोण करणार? दत्तमाऊलींनी संमतीदर्शक होकार दिला आणि भविष्यकाळातील घटनांचा वेध घेऊन जाण्याची अनुमती दिली. प्रेमभराने त्यांना निरोप दिला. दोन्ही नाथ गुरुवर्यांना नमस्कार करून पर्वताखाली उतरले. मच्छिंद्रनाथांची पावले अडखळत होती. पुन्हा पुन्हा मागे वळून पाहत होते. आश्रमाचे दर्शन घेऊन गुरुमाऊलींचे स्मरण करीत होते.

मच्छिंद्रनाथ आणि गोरक्षनाथ ही गुरुशिष्यांची जोडी काशी नगरीच्या दिशेने मार्गक्रमण करीत होते. मुक्कामावर मुक्काम करीत काशी नगरीमधल्या प्रयाग स्थानी येऊन पोहोचले, तेव्हा तेथील प्रजाजन अपार दुःखात आक्रोश करीत असल्याचे दिसले. कारण तिथला प्रजाप्रिय, धार्मिक पुण्यशील राजा मरण पावला होता. काशीनरेश त्रिविक्रमसिंह हा राजा अत्यंत न्यायी, उदार अतःकरणाचा, प्रतापादित्य, परोपकारी धर्मपालक म्हणून प्रख्यात होता. धर्मरक्षण आणि अधर्मपरिपत्यासाठी त्याचे सैन्य सदैव तयार असायचे, त्याची सत्ता, दरारा आणि वैभव अतुलनीय होते. विद्यापती श्रीगणेशाप्रमाणे चौदा विद्यानिपुण, गरीबांचा कनवाळु भ्राता आणि अधर्मी शत्रूंचा कर्दनकाळ होता. त्याच्या राज्यात बावन्न वर्णांचे जातीजमातीचे लोक गुण्यागोविंदाने सुखाने नांदत होते. त्याच्या राज्यात संत सज्जनांचा आदर केला

जात असे. प्रेजेचे त्यांच्यावर अपार प्रेम होते. प्रजा त्याला नृप नव्हे तर देव मानायची परंतु दुर्भाग्याने पोटी संतान नसल्याने, चिंतेने आणि वृद्धत्वाने देह खंगला होता. ज्वर होण्याचे निम्मित झाले आणि त्यांतच महानिर्वाण झाले. राजाचे गुणगान गात लक्षावधी लोक रडत आहेत. जणू काही त्यांच्या घरातलाच कोणी नातलग मृत्यु पावला असावा. असा शोक सर्वजण करीत आहेत. त्रिविक्रमची कांता; महराणी रेवती दुःख सागरात बुडाली आहे. तिचा आक्रोश अवर्णनीयच आहे. एकच आकांत मातला आहे. ते पाहून मच्छिंद्रनाथ अतिशय हळवे झाले. ते विचार करतात, "धन्य आहे अशा लोकप्रियतेची, कोण कोणासाठी उगीच रडत नसतो. राजा खरोखरच चांगला आणि परोपकारीही असावा म्हणून तर लोक शोक व्यक्त करीत आहेत. असा लक्षावधींचा पालक जर पुन्हा जिवंत करता आला तर पाहावा." अशा विचारांनी भारावून त्यांनी योग दृष्टीने राजाच्या आत्म्याचा शोध घेतला असतां राजा त्रिविक्रमसिंह ब्रम्हचैतन्यात विलिन झाल्याचे दिसून आले. ब्रम्हचैतन्य् आत्मा पुन्हा भूलोकी येणे अशक्य असतो हे माहित असल्याने नाथ मूक राहिले. पेरणी करण्यासाठी बीज नसेल तर सजीव वृक्ष कसा निर्माण होईल? त्याप्रमाणे आत्मा नसेल तर अचेतन देह सजीव कसा होईल. त्यामुळे नाईलाजास्तव मच्छिंद्रनाथ गप्प झाले. प्रजेच्या शोक यातना सहन करीत राहिले.

गोरक्षनाथांचे मनही दुःखावेगाने गहिवरले होते. प्रजेचा विलाप ऐकून त्यांनाही अश्रू आवरता आले नाहीत. वातावरणात असह्य तणाव निर्माण झाल्यामुळे दोघेही नाथ नगरीतून बाहेर पडले. जवळच्या निसर्गरम्य अशा एकांत स्थानी असलेल्या शिवालयात जाऊन शांतपणे बसले. तेथून जवळच काही अंतरावर राजाच्या अंत्यविधीची तयारी सुरु होऊन प्रेत चितेवर ठेवले गेले. प्रजाजन शवावर आडवे पडून दहन करू देईनात. अग्नी देण्यात अडथला निर्माण करू लागले. ते पाहून हळव्या मनाच्या गोरक्षनाथांच्या मनाचा क्षोभ झाला आणि अनावर दुःखाच्या वेगात ते म्हणाले, "गुरुजी! अशा आदर्श प्रजाहितदक्ष राजाला सजीव करावे. प्रजेची दयनीय शोकमग्नता मला पाहवत नाही." गुरुजींनी दटावले, 'गोरक्षा गप्प बस पाहू!" पण अग्नी लावण्याची वेळ जसजसी जवळ येऊ लागली, तसे अस्वस्थ होऊन गोरक्षनाथ म्हणाले, "गुरु महाराज! आपण जर राजाला जिवंत करणार नसाल तर मी स्वसामर्थ्यावर त्याला उठवीन." त्याच्या या उत्साहाला आवर घालण्याच्या उद्धेशाने नाथ म्हणाले, "शांत हो! त्याला जिवंत करायचे सामर्थ्य तुझ्यात नाही." त्यांना प्रतिवाद करताना गोरक्षनाथ म्हणाले, "गुरुदेव! मी जर त्याला उठविला नाही तर मी स्वतः प्राण त्याग करीन, स्वतःला अग्नीत समर्पित करीन. काय होईल ते होवो परंतु मी राजाला जिवंत करून या असंख्य प्रजाजनांना सुखी करेन. मी जर बोलल्याप्रमाणे वागलो नाही तर करोडो वर्षे रौख नरकवास भोगेन. हा माझा निश्चय आणि भीष्मप्रतिज्ञा आहे."

अरेरे गोरक्षा! उतावीळपणाने काय प्रतिज्ञा करून बसलास? राजाचा जीवात्मा येथे कुठेही नाही, तो साक्षात ब्रम्हचैतन्यात विलिन झाला आहे. तो परत येणे असंभव आहे." अत्यंत कळवळून केलेले हे भाष्य ऐकून गोरक्षनाथ थरारले दिव्यचक्षुंनी राजाच्या आत्म्याचा सर्वत्र शोध करू लागले आणि गुरुजींच्या म्हणण्यात तथ्य असल्याचे त्यांना जाणविले. आता प्रतिज्ञेनुसार वागले पाहिजे म्हणून म्लान मुखाने अग्निप्रवेश करण्यासाठी लाकडे गोळा करू लागले. ते पाहुन भयभीत होऊन नाथ मनात म्हणाले, "हा गोरक्ष म्हणजे वचनाची अतिशय कठोरपणे अंमलबजावणी करणारी वल्ली आहे. जे बोलेल ते कृतीत आणल्याशिवाय राहणार नाही. बाल्यावस्थेत त्याने वड्यासाठी स्वतःचा डोळाही काढून दिल्याचे त्यांना आठवले. त्याचा शब्द म्हणजे ब्रम्हवाक्य असते." मग गोरक्षाला हाक मारून म्हणाले, "अरे गोरक्षा! इकडे ये, फेकून दे ती लाकडे, या रुदन करणाऱ्या लोकांना राजा पुनश्च मिळवून देऊन सुखी करावे असे म्हणतोस ना? मग स्वतःच्या प्राणावर का उदार झालास? मानवाचे दुःख दूर करणे हेच तर आपले अवतार कार्य आहे. माझे ऐक,

तुझ्या प्रतिज्ञेसत्व मी बारा वर्षे राजा त्रिविक्रमाच्या शरीरात प्रवेश करतो. तेवढा काळ तू माझ्या देहाचे संरक्षण कर. बारा वर्षांनी मी पुन्हा माझ्या देहात येईन, मग तर झाले? एवढा एकच उपाय रास्त वाटतोय."

गोरक्ष गुरूंचा निश्चय ऐकून हेलावला होता. अधिक काही भावना व्यक्त करण्यासाठी शब्द नव्हते. गुरुविषयींची मनातली प्रतिमा अति विराट झाली. तो म्हणाला, "अवश्य गुरुदेव! जशी आज्ञा!" मच्छिंद्रनाथांनी शीघ्र स्वदेह सोडला आणि त्रिविक्रमसिंह राजाच्या देहात प्रवेश केला आणि क्षणार्धात राजा उठून बसला. प्रजेच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. लक्षावधींची हृदये आनंदाने भरून आली. दयाळू ईश्वराचे आभार मानत लोक म्हणू लागले, "अहो, आपणां सर्वांचा विलाप त्या दयाघन ईश्वराच्या कानावर गेला. आपली त्या ईश्वराला कणव आली असावी, त्यामुळेच प्रजेच्या सुखासाठी दयाळू परमेश्वराने राजाला जीवनदान दिले असावे." काही श्रद्धावंतांनी या मताला सहर्ष प्रतिसाद देत आपले ही मत व्यक्त केले. "खरे आहे तुमचे कदाचित राजाचे आयुष्यमान भरले नसावे. काळाने चुकून प्राण हरण केले असावे पण चूक लक्षात आल्यावर प्राण परत कुडीत सोडला असावा." सर्वांना अत्यानंद झाला. रचलेल्या चितेला काहीतरी भक्ष देणे क्रमप्राप्त असल्याने एक पुतळा तयार करून त्याचे विधिवत दहन केले. प्रजाजनांनी जयजयकाराच्या घोषात राजाला काशी नगरीत आणला. वस्तवात काय घडले याची कल्पना फक्त गोरक्षनाथांना ज्ञात होती. शिवमंदिरात सद्‌गुरूंच्या अचेतन देहाजवळ बसून गोरक्षनाथ सुरक्षित जागेबाबत विचार करीत आहेत. काही वेळाने पूजा करण्यासाठी गुरवीण मंदिरात आली. तिला बोलवून नाथ म्हणाले, "माई! मला तुझी मदत हवी आहे. प्रजेच्या आक्रोशास्त्व आणि हितासाठी माझ्या गुरु मच्छिंद्रनाथांनी स्वदेहाचा त्याग केला आणि त्रिविक्रमसिंह राजाच्या कलेवरात आत्म्याचा प्रवेश करविला आहे. त्यामुळे राजा सजीव झाला आहे. तरी आता गुरुजींचा देह बारा वर्षे सुरक्षित ठेवण्यासाठी एखादी उत्तम आणि सुरक्षित जागा तुला माहित असेल तर मला सांग. ते स्थान अतिशय गुप्त असावे. कुणालाही कळता कामा नये. बारा वर्षांनी पुन्हा गुरुजी उठून बसतील. तरी प्रसंगाचा गंभीरपणा लक्षात घेऊन तुझ्या माहितीतले एखादे गुप्त स्थान तू मला सुचव आणि याची वाच्यता मात्र कुठेही करू नकोस." गोरक्षनाथांची समस्या आणि निकड जाणून, गुरवीणीने शिवल्यामधली गुप्त गुहा दाखविली. सामान्य जनांना ती गुहा माहित नव्हती. नाथांनी त्या गुहेची पाहणी करून ती पसंत केली, गुरुजींचा देह आंतमध्ये सुरक्षित ठेवून गुहाद्‌वार पूर्वी होते तसे बंद केले. बाहेर येऊन शिवालयात बसले असतांना गुरवीण विचारू लागली, "गोरक्षनाथ, बारा वर्षे गुरुजींचा देह कसा काय सुरक्षित राहील? गोरक्ष म्हणाले, "माई! त्या देहाला चिरंजीव वर प्राप्त असल्याने त्याचा नाश होणार नाही. तो जसा आहे त्याच स्थितीत सुरक्षित राहील, परंतु कृपा करून तू हे कुठेही बोलू नये." अशा प्रकारे गोरक्षनाथांनी गुरवीणीला विश्वासात घेऊन तिचे सहाय्य मिळविले.

आता काशीनरेश त्रिविक्रमसिंह म्हणजे कायेने त्रिविक्रम पण आत्मा मात्र मच्छिंद्रनाथांचा, राज्यकारभार करीत आहे. मच्छिंद्रनाथ त्रिकालज्ञानी असल्याने त्यांना राजवाड्यात वावरतांना, कारभाऱ्यांशी भूतकाळातील घटनाबाबत चर्चा करतांना अडचण जाणवत नव्हती. सराईतपणे दिवसभराचे कामकाज संपवून सायंकाळी अंतःपुरात गेले. आनंदाच्या सर्वोच्च शिखरावर असलेल्या महाराणी रेवतीने त्यांचा सत्कार करून मंचकावर बसविले. पुनर्जन्माच्या आनंदावर प्रेमाचा वर्षाव करून तृप्ती केली. पूर्वीप्रमाणेच एकमेकांशी वार्तालाप करीत बसले, दुसऱ्या दिवशी स्नान पूजादी नित्यकर्मे उरकून महाराज राजसभेत आले. कालची अपूर्ण प्रकरणे निकालात काढून अचूक निर्णयाने मंत्री मंडळांसह सर्वांना आदेश दिले. महाराजांच्या कर्तव्य प्रयाणतेत आणि प्रेमळपणात कोणताही बदल झालेला नाही याची प्रचिती नाथांनी दिली

आणि संबंधितांनीही खात्री करून घेतली. पूर्वीच्या नित्यनियमाप्रमाणे, सायंकाळी दर्शनासाठी आले. शिवलिंगाचे मनोभावे पूजन करून नमन केले. मंदिरात बसलेल्या गोरक्षनाथांना पाहून अनोळखीपणाचे सोंग घेऊन विचारले, "तपस्वी नाथ! आपले आगमन केव्हा झाले? आपले नाव सांगून उपकृत करावे." जगाला दाखविण्यासाठी गुरुजींचे हे नाट्य ओळखून गोराक्षांनीही अनुरूप उत्तरे दिली. दोघे संभाषण करीत शिवालयात फिरत आहेत. जवळपास कोणी नाही हे निरखून महाराजांनी हस्तसंकेतांनी विचारले, "देहाच्या संरक्षणाची काय व्यवस्था केली आहे?

हस्तसंकेताचा अर्थ जाणून गोरक्षनाथांनी देखील सांकेतिक उत्तर देऊन सर्व इतिवृत कथन केले. तसेच गुप्त गुहेची ओळखु न येणारी दरवाजाची जागा दाखविली. मंदिरात प्रदक्षिणा करून उभयता काही वेळ नंदी मंडपात बसले. मग महाराज राजवाड्याकडे गेले. अशा प्रकारे शिवमंदिरात येऊन, गोरक्षासमवेत प्रदाक्षणेच्या निमित्ताने संभाषण करायचा आणि घडीभर बसायचा महाराजांचा नित्यनियम झाला. पाहता पाहता तीन महिन्यांचा अवधी सरला. एके दिवशी गोरक्षनाथांनी तीर्थाटनांसाठी अनुमती मागितली असतां महाराजांनी अनुज्ञा दिली आणि गुहा रक्षण करायचेही मान्य केले. त्यामुळे गोरक्षनाथ निर्धास्त होऊन तीर्थयात्रेला निघून गेले. महाराज दररोज शिवदर्शन करून गुहेकडे नजर टाकून जात होते.

सहा महिन्याच्या कालावधीत सुखाला विलक्षण बहर आला. महाराणी गर्भार राहिली. दिसामासांनी गर्भ वाढून कालावधी पूर्ण होताच, पुत्ररत्नाचा जन्म झाला. देखण्या आणि लोभस बाळाच्या आगमनाने सारी नगरी आनंदात विहरत होती. बाराव्या दिवशी भव्य स्वरूपात बाळाचा नामकरण विधी संपन्न झाला. बाळाचे नाव 'धर्मनाथ' असे ठेवले. सुखाचा काळ अधिक वेगात काळक्रमण करीत असतो. धर्मनाथ पाच वर्षाचा झाला. एके दिवशी महाराजांसमवेत, पूजेचे तबक घेऊन रेवती राणी शिवमंदिरात आली होती. दास, दासी सेवकांचा लवाजमा तिच्यसोबत होता. राजदांपत्य पूजा करीत असल्याने सर्वजण बाहेर उभे होते. महापूजा आटोपताच प्रदक्षिणेच्या निमित्ताने महाराज गाभाऱ्यातून बाहेर पडले. शुद्ध भावनेने हात जोडून राणी महादेवाला प्रार्थना करीत म्हणाली, "हे अपर्णापती महादेवा, तुझी कृपा होती म्हणून माझ्या पतींचा पुनर्जन्म झाला आणि माझे सौभाग्य अभंग राहिले. ते असेच अखंड राहू दे. मला अहेवपणी सद्गती दे. पतीच्या आधी मला मृत्यु येऊ दे हीच तुझ्या चरणी प्रार्थना आहे." राणीचे बोल ऐकून गाभाऱ्यात उपस्थित गुरवीणीला हास्य अनावर झाले आणि एखादा विनोद घडल्याच्या जाणीवेने ती खळखळून हसू लागली पण त्वरित स्वतःला सावरले आणि निशब्द झाली. तिचे हसणे आणि गप्प राहणे राणीला खटकले. राणेने विचारले, "तुला हसू का आले गुरव स्त्रिये!" "काही नाही राणीसाहेब! उगीच हसू आले." त्यावर राणी म्हणाली, "अंग, ते उगीच आलेले हसू नव्हते उस्फुर्तपणे प्रतिक्षिप्त क्रियेने ते बाहेर पडले आहे. काही तरी सबळ कारण असल्याशिवाय असे हास्य फुलणार नाही, का हसलीस ते सांग!" गुरवीण पेचात सापडली, तिला काय उत्तर द्यावे हे सुचेना, अतिशय भयभीत झाली. राणीची भेदक नजर तिच्या अंतरंगाचा ठाव घेत होती. महादेवाच्या साक्षीने खोट्याची, असत्याची बतावणी कशी करावी? आणि खरे सांगावे तर वचनभंगाचे पाप माथी येणारच आहे. मनाच्या दोलायमान अवस्थेत ती हतबल झाली आणि हात जोडत म्हणाली, "हास्या मागचे खरे कारण सांगितले तर अनर्थ होईल. सांगितले अथवा न सांगितले तरी मी मात्र संकटातच आहे. मला तर भय वाटते आहे. दिव्याच्या ज्योतीवर पतंग जळावा, त्याप्रमाणे तुम्हा सारख्या बलवानांचा कोप झाल्यास माझ्यासारखी अबला दग्ध होईल. शक्तिमान सिंहाच्या पंजाच्या एकाच फटक्यात ससा मरून पडावा त्याप्रमाणे मी मरून जाईन."

“गुरवीणी! निर्भय होऊन सत्य संग, तुला माझे अथवा महाराजांचे भय वाटत असेल तर अभय आहे. या महादेवा समक्ष मी तुला वचन देत आहे.” रेवती राणीने तिला विश्वासात घेतले.

‘राणीमाता! आपण जरा एकांत जागी चला, मग सारं काही सांगते,” मग राणीने सर्वांना आणखी दूर जाण्यास सांगून पूर्ण एकांत असल्याची खात्री करून घेतली आणि गुरवीण सांगू लागली. “स्वामिनी महाराणी, आपण अज्ञानास्त्व स्वतःला सुवासिनी समजत आहात, वास्तविक पाहता, त्रिविक्रम महाराज मृत्यु पावले त्याच वेळी आपण विधवा झाल्या आहात. सांप्रत वावरणाऱ्या महाराजांचा देह जरी त्रिविक्रम राजाचा असला तरी त्या देहात मच्छिंद्रनाथांच्या आत्म्याने प्रवेश केला आहे. आपले पती त्रिविक्रम नसून त्यांच्या रुपात मच्छिंद्रनाथ आहेत, हेच खरे वास्तव आहे. याच शिवालयात त्यांचा अचेतन देह, त्यांच्या शिष्याने, गोरक्षनाथांनी सुरक्षितपणे दडवून ठेवला आहे. बारा वर्षांनी मच्छिंद्राचा आत्मा त्रिविक्रम देह त्यागून स्वदेहात प्रवेश करणार आहे. त्याक्षणी त्रिविक्रमाचा देह निष्प्राण कलेवर होईल. अशी ही गुप्त गोष्ट आहे. त्यामुळे तुम्ही विधवा असूनही महादेवा जवळ सुवासिनीचे मरण मागत होतात, या विरोधाभासाने माझ्या मुखातून उत्स्फूर्त हास्य निघाले.” त्या गुरवीणीच्या स्पष्टीकरणामुळे थक्क झालेली राणी म्हणाली, “तू सांगतेस हे सत्य कशावरून? मला मच्छिंद्रनाथांचा दडवून ठेवलेला अचेतन देह दाखव.” मग गुरवीणीने गुहेचे गुप्त द्वार उघडून योगीराज मच्छिंद्रनाथानंचा अचेतन देह तिला दाखविला.

विमनस्क अवस्थेत महाराणी राजमहालात एकांतात विचार करीत आहे. “दैवाने माझी क्रूर थट्टा केली आहे, माझा काही ही अपराध नसताना माझे पातिव्रत्य भंग झाले, संचितात होते ते घडून गेले आहे. आता भवितव्याच्या दृष्टीकोनातून हिताचा विचार केला पाहिजे. पतीच्या मृत्युनंतर मच्छिंद्रनाथांपासून पुत्र होऊन वंशाचा वेल वाढला, तरी त्यांत पापाचरण केले नाही. पुरातन काळी व्यासऋषींच्या वीर्यापासून भरतवंशाची उत्पत्ती झाली. याचीच पुनरावृत्ती कुंतीपुत्रांच्या जन्मांत पुढे झाली. पाच देवांच्या वीर्यापासून पाच महापुरुषांचा जन्म झाला होता. तसाच एक किर्तीवंत आणि दानशूर पुत्र कुमारी अवस्थेत जन्मला होता. जगात ते वंदनीय ठरले. त्यामुळे वंशवृद्धीसाठी उत्तम देह निवडून त्याच्याशी शरीरसंबंध ठेवायची निती म्हणजे पापाचे आचरण किंवा अनैतिक कृत्य होऊ शकत नाही. मी पापचरणी असूच शकत नाही. जे घडले ते विधीलिखित होते. प्रारब्ध योग समजू या, पण पुढे बारा वर्षांचा कालावधी संपल्यानंतर मात्र अनर्थ होणार हे निश्चित! त्रिविक्रमाचा देह त्यागून मच्छिंद्रनाथ स्वदेहात जातील. राजकुमार धर्मनाथ अज्ञान असल्याने राज्यकारभार सांभाळण्यास सक्षम नाहीत. संकटग्रस्त अवस्था होईल. त्यामुळे त्रिविक्रमांच्या देहात मच्छिंद्रनाथांचा आत्मा कायम राहणे हेच सर्वकालीन हिताचे आहे. जर गुहेतील मच्छिंद्र देह नष्ट केला तर त्यांच्या आत्म्याला त्रिविक्रमच्या देहातच राहावे लागेल. मच्छिंद्राची अचेतन कुडी नष्ट झाल्यास आत्मा परतीचा मार्गच बंद होईल.” असा विचार करून तिने मनाशी एक योजना आखली. एक दासी आणि दोन धट्टेकट्टे सशस्त्र मजूर सोबत घेऊन रेवती राणी मध्यरात्रीच्या सुमारास शिवालयात गेली. निर्मनुष्य एकांतात गुहेचे दार उघडून, मच्छिंद्रनाथांच्या देहाचे राई राई एवढे तुकडे केले. एका गोणपाटात भरून अरण्यात नेऊन सर्वत्र विखरून फेकून दिले गेले. संशय येऊ नये म्हणून गुहामुख पुनश्च बंद केले. कुठे याची वाच्यता झाल्यास शिरच्छेदाची धमकी देऊन राणी निघून गेली.

मच्छिंद्रनाथ हे मानवी देहात परावर्तीत झालेले साक्षात कविनारायणांचे, परमेश्वरी अवतारातील दृश्य रूप होते. त्या देहाची अशी विल्हेवाट लावली गेली, याची जाणीव प्रथम जगन्माता उमा हिस झाली. या भयानक घटनेची माहिती श्री

शिवाकडे देण्यासाठी ती धावली, “कैलासनाथ, अघटीत घडले आहे, जागे व्हावे, तुमचा प्राणप्रिय पुत्र मच्छिंद्राच्या देहाचे राई राई एवढे तुकडे झाले आहेत. रेवतीने मच्छिंद्राची कुंडी भंग केली, महाराज! शीघ्र जागे व्हा.” समाधी भंग होऊन आदिनाथ खडबडून जागे झाले आणि दिव्य दृष्टीने पहिले असतां त्यांना विपरीत घडल्याचे दिसून आले. महादेव उमेला म्हणाले, “अतिशय क्लेशकारक घटना घडली आहे, आता त्वरित यक्षणी करवी देहाचा प्रत्येक अंश वेचून आणावा, आणि एकत्र करून कैलासावर ठेवावा.” श्री शिवाच्या आज्ञेची कार्यवाही तातडीने करण्यात आली. पार्वतीने आदेश देताच असंख्य यक्षिणी भूतलावर उतरल्या. मच्छिंद्रनाथांच्या देहाचा कणन् कण वेचून कैलासावर नेला. पार्वतीमातेच्या आज्ञेनुसार रक्षणासाठी विरभद्राच्या ताब्यात देह देण्यात आला.

यक्षणी अत्यानंदाने वीरभद्राला सांगत आहेत, “स्वामी पृथ्वीतळावरील तुमचा आणि आमचा शत्रू मच्छिंद्राच्या देहाचे हे तुकडे आहेत, यानेच तुमच्याशी युद्ध केले होते. यानेच अष्टभैरावांना घायाळ केले होते. आम्हा विवस्त्र करून लज्जा हरण केले होते. यानेच वायुपुत्र मारुतीला माथ्यावर पर्वत घेतलेल्या अवस्थेत अधांतरी बद्ध करून त्याची विकलावस्था केली होती. याने अनेकांना पिडले आणि लज्जित केले आहे. हा सर्व देवतांचा शत्रू आहे. पृथ्वीवर जन्मलेली ही हीनजाती आहे. बरी खांडोळी झाली याची. या दुष्टाचा शिष्य, गोरक्ष हा सुद्धा याच्याच सारखा आहे. आज ना उद्या तो याच्या देहाची मागणी करण्यासाठी अवश्य येईल तरी याचा देह परत देऊ नये. सावध राहून रक्षण करावे. अपणा सर्वांचा वैरी खांडोळी होऊन आपल्याच हातात असल्याने, यासारखी सुवर्णसंधी नाही.” वीरभद्राला अत्यानंद होऊन त्याच्या मनातील भावनाच जणू यक्षिणींनी व्यक्त केल्या आहेत. त्याने कोट्यवधी सशस्त्र यक्षिणी, चामुंडा, शंखिनी, डंखीनी यांच्या जागत्या पहाऱ्यांत आणि चौऱ्याऐंशी कोटी बहात्तर लक्ष शिवगण्यांच्या गराड्यात मच्छिंद्रनाथांच्या देहाची खांडोळी बंदिस्त केली.

इथे काशीनगरीत काशीराज त्रिविक्रम मात्र प्रतिदिनी शिवालयात येऊन गुहेचे द्वार ‘जैसे थे’ असल्याचे पाहून समाधानाने परत जात पण आतमध्ये देह सुरक्षित आहे की नाही हे त्यांनी ही पहिले नाही. आणि रेवती राणीनेही आजीबात वाच्यता केली आणि दोघेही सुखाने राजवैभव भोगत आहेत. पण बारा वर्षांचा कालावधी पूर्ण होण्याचा समय जवळ आल्याने गोरक्षनाथ मात्र सावध झाले आणि तीर्थाटनाचा मार्ग काशी नगरीकडे वळविला.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने संकटे आणि विघ्ने टळून आयुष्यवृद्धी होईल.